**श्री. आर. एस. माणके, मुख्य प्रशासकीय अधिकारी, सामान्य रुग्णालय, चंद्रपूर यांना केंद्र शासनाच्या रक्षा मंत्रालय अंतर्गत महासंचालक, चिकित्सा सेवा या कार्यालया तील आरोग्य निरीक्षक या पदाची सेवा सलग जोडून देणेबाबत..**

# महाराष्ट्र शासन

## सार्वजनिक आरोग्य विभाग

## शासन निर्णय क्रमांकः संकीर्ण-१०१५/प्र.क्र.४३९/सेवा २

गो. ते. रुग्णालय इमारत, १० मजला, ए विंग,
मंत्रालय, मुंबई -४०० ००१
दिनांक: ०४ मार्च, २०२२

**वाचा -**

१) श्री.राजेंद्र माणके, से.नि.मुख्य प्रशासकीय अधिकारी, प्रादेशिक मनोरुग्णालय, आरोग्य सेवा नागपूर यांचे दि.४.०६.२०१५ रोजीचे पत्र
२) लोक आयुक्त आणि उप लोक आयुक्त यांचे दि.१२.०८.२०१५ रोजीचे पत्र
३) सह संचालक, आरोग्य सेवा ( अर्थ व प्रशासन ), मुंबई यांचे दि.२१.११.२०१६ रोजीचे पत्र
४) केंद्र शासनाच्या रक्षा मंत्रालय अंतर्गत नियुक्ती अधिकारी महासंचालक, चिकित्सा सेवा (थळसेना) सेना मुख्यालय, नवी दिल्ली यांचे दि.०२.०९.१९७१ रोजीचे नियुक्ती पत्र
५) शासन निर्णय वित्त विभाग, क्र.पीईएन-१०८३/सी.आर.४३८/८३/एसईआर,दि.०४.०४.१९८३
६) शासन निर्णय सार्वजनिक आरोग्य विभाग,क्र.आरक्युएन/एडीओ/१०८४/५१३९/सीआर ७४/८८/सेवा १, दि.०३.११.१९८८
७) केंद्रशासनाचे कार्यालयीन आदेश क्र.२८/१०/९५-पीॲन्डपीडब्ल्यू(बी), दि.२५.१०.१९९६

**प्रस्तावना -**

श्री. राजेंद्र माणके (सेवा निवृत्त) मुख्य प्रशासकीय अधिकारी, उपसंचालक, आरोग्य सेवा, नागपूर यांनी त्यांची केंद्र शासनाकडील दि.०२.०९.१९७१ ते दि.०२.०१.१९८९ पर्यंत सलग स्थायी सेवा झालेली असुन, त्यांनी केंद्र शासनाकडील सेवा, सेवानिवृत्ती विषयक लाभाकरीता ग्राह्य धरण्याची विनंती केलेली आहे. महाराष्ट्र लोकसेवा आयोगामार्फत नामनिर्देशनाने राज्य शासनाकडे शा.नि.क्र.आरक्युएन/एडीओ/१०८४/५१३९/सीआर ७४/८८/सेवा १, दि.०३.११.१९८८ अन्वये नियुक्ती झाल्यावर ते दि.०२.०१.१९८९ रोजी रुजु झालेले आहेत. श्री. राजेंद्र माणके यांची केंद्र शासनाकडील सेवा तसेच राज्य शासनाकडील सेवेत कुठे ही खंड पडलेला नाही. श्री.माणके यांनी वित्त विभाग शासन निर्णय दि.०४.०४.१९८३ व शासन परिपत्रक दि.१२.०१.२००७ मधील सर्व अटींची पूर्तता केलेली असल्याने, त्यांना महाराष्ट्र नागरी सेवा ( निवृत्ती वेतन) नियम १९८२ व सर्वसाधारण भविष्य निर्वाह निधी योजना लागू होतात.

त्याअनुषंगाने, श्री. राजेंद्र माणके, सेवानिवत्त मुख्य प्रशासकीय अधिकारी यांची नामनिर्देशनाने राज्य शासन सेवेत नियुक्ती होण्यापूर्वीची केंद्र शासनाकडील सेवा राज्य शासनातील सवेशी संलग्न करुन सेवानिवृत्तीविषयक लाभांसाठी ग्राह्य धरणे आवश्यक असल्याने, श्री. राजेंद्र माणके यांची केंद्र शासनाकडील

दि.०२.०९.१९७१ ते दि.०२.०१.१९८९ पर्यंतची एकुण १७ वर्ष ०४ महिने इतकी सेवा ही राज्य शासनाकडील प्रशासकीय अधिकारी, गट-ब या पदावरील सेवेशी सलग जोडून देऊन, सदर सेवा निवृत्ती विषयक लाभांसाठी ग्राह्य धरण्यास मान्यता देण्याची बाब शासन विचाराधीन होती.

**शासन निर्णय -**

श्री. राजेंद्र माणके (सेवा निवृत्त) मुख्य प्रशासकीय अधिकारी उपसंचालक, आरोग्य सेवा, नागपूर यांची केंद्र शासनाकडील दि.०२.०९.१९७१ ते दि.०२.०१.१९८९ पर्यंतची सलग स्थाई सेवा दि.०३.०१.१९८९ रोजी पासूनच्या शासनाकडील सेवेस सलग जोडून देण्यास व त्याअनुषंगाने महाराष्ट्र नागरी सेवा ( निवृत्ती वेतन ) नियम, १९८२ व सर्वसाधारण भविष्य निर्वाह निधी योजनेचे वेतन विषयक देय लाभ अदा करण्यास खालील अटीच्या पूर्ततेच्या अधीन राहून शासन मान्यता प्रदान करण्यात येत आहे:-

(१) संदर्भीय दिनांक ०४.०४.१९८३ च्या शासन निर्णयातील परिच्छेद २ (ब) नुसार, "राज्य/केंद्र शासनाकडील अस्थायी पदे धारण करीत असताना ज्यांनी केंद्र/राज्य शासनाच्या नियंत्रणाखालील पदांसाठी संबंधित कार्यालयाद्वारे/संबंधित प्रशासकीय प्राधिकाऱ्याची आवश्यक ती परवानगी घेऊन अर्ज केला आहे,"याबाबत खातरजमा करावी. तसेच,

(२) केंद्र शासनाकडील तात्पुरत्या सेवेबद्दल शासकीय कर्मचाऱ्यास कोणतेही उपदान मिळाले असल्यास त्याला ते संबंधित शासनास परत करावे लागेल, याबाबतचे हमीपत्र घेण्यात यावे.

२. श्री.माणके (सेवा निवृत्त) मुख्य प्रशासकीय अधिकारी, उपसंचालक आरोग्य सेवा, नागपूर या पदाची दि.०२.०९.१९७१ ते दि.०२.०१.१९८९ पर्यंत सलग स्थाई सेवा दि.०३.११.१९८८ या पदावरील रजा महाराष्ट्र नागरी सेवा (रजा) नियम, १९८१ च्या नियम २१ नुसार नवीन पदावरील रजेच्या हिशोबात जमा करण्यात यावी.

३. सदरचा शासन आदेश, वित्त विभागाने अनौपचारिक संदर्भ क्र.२०/२२/सेवा-७ दि.१८.०२.२०२२ अन्वये दिलेल्या सहमतीस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२२०३०४११३०११०५१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Chandrakant Haridas Wade

Digitally signed by Chandrakant Haridas Wade
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Social Justice & Special Assist Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=7a8cb09a73bc92b24a171080ebd81893480c90bedd57685ea1ce3af533f64bce, serialNumber=9474e7143b2bc3fd96e8d7bf07d1ce51de8461d4c34ae1e3f643c11b54523936, cn=Chandrakant Haridas Wade
Date: 2022.03.04 12:41:24 +05'30'

**(चंद्रकांत ह.वडे)**

**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रत,

१) आयुक्त आरोग्य सेवा तथा अभियान संचालक राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई

२) कक्ष अधिकारी,लोक आयुक्त आणि उप लोक आयुक्त महाराष्ट्र राज्य, यांचे कार्यालय, मुंबई
३) संचालक, आरोग्य सेवा(१/२), मुंबई /पुणे.
४) सहसंचालक, आरोग्य सेवा (अर्थ व प्रशासन), मुंबई
५) उपसंचालक, आरोग्य सेवा नागपूर मंडळ, नागपूर
६) जिल्हा शल्य चिकित्सक, सामान्य रुग्णालय, नागपूर
७) महालेखापाल (लेखा परिक्षा) महाराष्ट्र - १ , मुंबई /महाराष्ट्र - २, नागपूर
८) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र - १ , मुंबई /महाराष्ट्र - २, नागपूर
९) जिल्हा कोषागार अधिकारी , नागपूर
१०) मा.मंत्री (आरोग्य) / मा.राज्यमंत्री (आरोग्य) यांचे खाजगी सचिव
११) अपर मुख्य सचिव, सा. आ. विभाग, मंत्रालय, मुंबई यांचे स्वीय सहायक
१२) संबंधित अधिकारी (संचालक, आरोग्य सेवा आयुक्तालय, मुंबई यांचेमार्फत)
१३) निवडनस्ती (सेवा - २)